सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता निसर्ग पर्यटन योजनेंतर्गत स्व.उत्तमराव पाटील वन उद्यान निर्मिती (२४०६ २२९५) लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सावंवि-२०१९/प्र.क्र.११७ /फ-११**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**दिनांक : २७ नोव्हेंबर, २०१९**

**वाचा :-**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. अंदाज-२०१५/ प्र.क्र.३/ फ-११, दि. १६.०६.२०१५
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. सावंवि-२०१८/ प्र.क्र.११३/ फ-११, दि. १३.०६.२०१९
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क. ९२ /अर्थ-३, दि.०८.०७.२०१९
४) प्रधान मुख्य वनसरंक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य , नागपूर यांचे क्रमांक कक्ष -१/पी/यो/नबाप्र/ प्र.क्र.२६/१२०४/२०१९-२०-१९, दि. ०२.११.२०१९ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

स्व.उत्तमराव पाटील वन उद्यानाची निर्मिती ( वन व वनेतर जमिनीवरील जैव विविधता व निसर्ग सरंक्षण योजना ) ही योजना संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये अंमलात आली आहे. या योजनेतर्गत राज्यातील प्रत्येक जिल्हयात २ ठिकाणी याप्रमाणे एकूण ६८ उद्याने गावे/ शहरे या अंतर्गत तसेच त्यांच्या लगत उपलब्ध असलेल्या शासकीय क्षेत्रावर सल्लागार नेमून वन उद्यानांची निर्मिती करणे. त्याच बरोबर सध्या वन विभागांतर्गत अस्तित्वात असलेल्या राष्ट्रीय व इतर उद्याने यांची आवश्यकतेनुसार श्रेणीवाढ करणे असे या योजनेचे स्वरुप आहे. तसेच सदर योजना सन २०२२-२३ पर्यत पुढे चालू ठेवण्यास सदंर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. मागणी क्र. सी-०७-२४०६, वनीकरण व वन्यजीवन राज्य योजनांतर्गत योजना (०२)(०६) निसर्ग पर्यटन (राज्य) (२४०६ २२९५) या योजनेंतर्गत निरनिराळया एकूण ४ योजनांकरिता सन २०१९-२० साठी रु. ५६००.०० लक्ष निधी मार्च २०१९ च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनात अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. त्यापैकी स्व. उत्तमराव पाटील वन उद्यान निर्मिती या योजनेसाठी रु. १५००.०० लक्ष निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. त्यातून निधी वितरित करण्यासाठी प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) , महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ४ येथील पत्रान्वये रु.६७.१७ लक्ष रकमेचा चालू बाब प्रस्ताव सादर केला आहे.

३. वित्त विभागाच्या दि.०८.०७.२०१९ च्या परिपत्रकानुसार स्व. उत्तमराव पाटील वन उद्यान निर्मितीसाठी अर्थसंकल्पित निधीच्या ( रु.१५००.०० लक्ष) ६०% मर्यादेत रु.९००.०० लक्ष इतका निधी वितरणासाठी उपलब्ध असून त्यापैकी रु. ६७.१७ लक्ष निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

सामाजिक वनीकरण विभागांमार्फत राबविण्यात येणाऱ्या निसर्ग पर्यटन- राज्य योजनांतर्गत योजना, (०२)(०६) **स्व.उत्तमराव पाटील वन उद्यान निर्मिती (२४०६ २२९५ )** हया योजनेकरिता सन २०१९-२० या वित्तीय वर्षात मागणीनुसार खाली नमूद केल्याप्रमाणे रु.६७.१७ लक्ष निधी वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | सामाजिक वनीकरण वृत्त | विभागाचे नांव | रक्कम (रुपये लाखात) |
|---|---|---|---|
| १ | नाशिक | अहमदनगर | १४.१० |
| २ | ठाणे | ठाणे | ३८.१२ |
| ३ | | रत्नागिरी | ४.८८ |
| ४ | | सिंधुदूर्ग | ३.६८ |
| ५ | पुणे | सातारा | ६.३९ |
| | **एकूण** | | **६७.१७** |

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. मंजूर निधीचे जिल्हानिहाय वाटप करण्यास प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

**३. प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसकल्प, नियोजन व विकास ) हे वर्ष २०१८-१९ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरित केलेल्या निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसात शासनास सादर करतील या अटीच्या अधीन राहून वरील निधी वितरित करण्यात येत आहे.**

**४. सदर निधी वितरित करण्यापूर्वी प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ) यांनी सदर योजनेसाठी, सन २०१८-१९ करिता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली व्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळती केला नसल्याची खात्री करावी. तसेच , सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक २ येथील परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे. वितरित केलेला निधी मंडळे/ महामंडळे यांच्या वा इतर बँक खात्यात स्वीय प्रपंजी लेख्यामध्ये अथवा सार्वजनिक बांधकाम विभागाकडे ठेव अंशदान निधीमध्ये काढून ठेवता येणार** नाही.

५. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

६. सदर योजनेअंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून वित्त विभागाच्या संदर्भिय दिनाक ०८.०७.२०१९ रोजीच्या परिपत्रकानुसार खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. सी-०७,**
**२४०६, वनीकरण व वन्यजीवन,राज्य योजनांतर्गत योजना,**
**८००(०२)(०६) निसर्ग पर्यटन ( राज्य )**
**स्व.उत्तमराव पाटील वन उद्यान निर्मिती (२४०६ २२९५ )**

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८.०७.२०१९ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९११२७१७५४३४३२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIRENDRA RAMBAHAL TIWARI

Digitally signed by VIRENDRA RAMBAHAL TIWARI
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a6498 6631086810, postalCode=400032, street=R AND F D,4TH FLOOR,MANTRALAYA,MUMBAI, ou=FOREST DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VIRENDRA RAMBAHAL TIWARI
Date: 2019.11.27 17:56:41 +05'30'

**( वीरेंद्र तिवारी )**
**अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक( मंत्रालय )**

**प्रत,**

१. प्रधान प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य,नागपूर.

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. मुख्य वनसंरक्षक ( प्रादेशिक ) नाशिक, ठाणे, पुणे.
५. वनसरंक्षक, सामाजिक वनीकरण, नाशिक, ठाणे, पुणे
६. विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण नाशिक, ठाणे, पुणे
७. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक, ठाणे, पुणे
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
१०. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
११. वित्त विभाग, व्यय-१०, अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. निवडनस्ती/फ-११.